**राज्यातील सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये प्राणी जन्म नियंत्रण (Animal Birth Control) नियम, २०२३ लागू करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- प्राजनि-२०२५/प्र.क्र. १३/नवि-२०**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २० मार्च, २०२५

**वाचा :** १) प्राणी जन्म नियंत्रण (Animal Birth Control) नियम, २०२३ दिनांक १६.०३.२०२३.
२) नगर विकास विभाग, शासन परिपत्रक क्र.विसआ-२०१५/प्र.क्र. ३६१/नवि-२०, दिनांक १९.१२.२०२२.

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाद्वारे प्राणी जन्म नियंत्रण (Animal Birth Control) नियम, २०२३ तयार करण्यात आला आहे. सदर नियमांतर्गत भटक्या कुत्र्यांना पकडणे, लसीकरण करणे, नपुंसक करणे आणि परत सोडणे इ. प्रक्रिया राबविण्याचे निर्देश दिले आहेत. ॲनिमल बर्थ कंट्रोल (ABC) नियम, २०२३ अन्वये अँटी रेबीज कार्यक्रम राबविण्याबाबत मार्गदर्शक तत्वे प्रदान करणे, कुत्र्यांची संख्या क्रूरतेशिवाय नियंत्रित करणे ही या नियमांची उद्दिष्टे असुन भारतातील भटक्या कुत्र्यांवर नियंत्रण ठेवणे हे नियम, २०२३ चे मुख्य उद्दिष्ट आहे. त्यामुळे प्राणी जन्म नियंत्रण (Animal Birth Control) नियम, २०२३ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या कायद्याची अंमलबजावणी करणे आवश्यक असल्याने महाराष्ट्र राज्यात त्याची तातडीने कार्यवाही होणे देखील आवश्यक आहे. ही बाब विचारात घेता केंद्र शासनाच्या The prevention of Cruelty of Animals Act, १९६० व The Animal Birth Control (ABC) Rules, २००१ ची काटेकोरपणे अंमलबजावणी करणे व भटक्या कुत्र्यांमुळे होणाऱ्या उपद्रवाकरिता आवश्यक उपाययोजना करण्याबाबत या संदर्भात निर्गमित करण्यात आलेले शासन परिपत्रक क्र.विसआ-२०१५/प्र.क्र. ३६१/नवि-२०, दि.२२.११.२०१६ अधिक्रमित करुन केंद्र शासनाच्या प्राणी जन्म नियंत्रण (Animal Birth Control) नियम, २०२३ नुसार निर्गमित केलेल्या तरतुदींची अंमलबजावणी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्यात The prevention of Cruelty of Animals Act, १९६० व The Animal Birth Control (ABC) Rules, २००१ ची काटेकोरपणे अंमलबजावणी करणे व भटक्या कुत्र्यांमुळे होणाऱ्या उपद्रवाकरिता आवश्यक उपाययोजना करण्याबाबत या संदर्भात निर्गमित करण्यात आलेले शासन परिपत्रक क्र.विसआ-२०१५/प्र.क्र. ३६१/नवि-२०, दि.२२.११.२०१६ याद्वारे अधिक्रमित करण्यात येत असुन राज्यातील सर्व महानगरपालिका / नगरपालिका / नगरपंचायतींमध्ये कमिशन फॉर प्रोटेक्शन ऑफ चाइल्ड राइट्स (CPCR) कायदा, २००५ च्या कलम १३ मधील शिफारशी व प्राणी जन्म नियंत्रण (Animal Birth Control) नियम, २०२३ ची अंमलबजावणी करण्यास्तव लागू करण्यात येत आहे.

०२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२०१७३३१३८२२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

ANILKUMAR RAMDASPANT UGLE

Digitally signed by ANILKUMAR RAMDASPANT UGLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=1d265dc74c98f72f41f5a1403db16525e09e7de2e336c366de3a32ea2a050a8a, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=8BBD8635D43D23F28021156F38051619258C51238668F40D15D3209EA39554AA, cn=ANILKUMAR RAMDASPANT UGLE
Date: 2025.03.20 17:33:53 +05'30'

**(अनिलकुमार उगले)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय, मुंबई.
३) मा. उप मुख्यमंत्री (नगर विकास) यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई.
४) मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई.
५) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६) सर्व सन्माननीय विधानसभा / विधानपरिषद व संसद सदस्य,
७) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८) सचिव, गृहनिर्माण व शहरी व्यवहार मंत्रालय, नवी दिल्ली.
९) सर्व मंत्रालयीन विभागाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई
१०) सर्व विभागीय आयुक्त
११) सर्व जिल्हाधिकारी
१२) सर्व आयुक्त, महानगरपालिका.
१३ आयुक्त तथा संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय, बेलापूर, नवी मुंबई.
१४) सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषद/नगरपंचायती
१५) निवडनस्ती (नवि-२०)